सन २०१८-१९ या वर्षात राष्ट्रीय कृषी विकास योजनेंतर्गत रु.१०० कोटी निधीचा कृषी यांत्रिकीकरण कार्यक्रम राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः कृयांउ-०९१८/ प्र.क्र.२५९/१४अे**

मादाम कामा मार्ग, हुमात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय (विस्तार), मुंबई- ४०० ०३२

तारीख: १० ऑक्टोबर, २०१८

**संदर्भ:-**

१. शासन पत्र क्र. कृयांयो-०४१८/प्र.क्र.८१/१४-अे, दि. २ एप्रिल, २०१८.

२. शासन निर्णय क्र. ०४१८/प्र.क्र.१५५/१४-अे, दि. २७ एप्रिल, २०१८

३. कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र. जा.क्र/राकृवियो/उशेसशे/२०१८-१९/३३५/गुनि-५/२०१८, दि. २० ऑगस्ट, २०१८

४. शासन पत्र क्र. राकृवि-०५१८/प्र.क्र.१६२/१४-अे, दि. २७ ऑगस्ट, २०१८.

**प्रस्तावना**

शेतकऱ्यांच्या उत्पन्नामध्ये वाढ करण्यासाठी तसेच कृषी क्षेत्रामध्ये उर्जा वापर वाढविण्यासाठी, केंद्र पुरस्कृत कृषी यांत्रिकीकरण उपअभियान राज्यात राबविण्यात येत आहे. याशिवाय विविध केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत जसे, राष्ट्रीय गळीतधान्य, तेलबिया व तेलताड अभियान, राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान व राष्ट्रीय फलोत्पादन अभियान या अभियानांतर्गत सुद्धा कृषी यांत्रिकीकरण घटकासाठी काही प्रमाणात निधी उपलब्ध करुन देण्यात येतो. असे असले तरी शेतकऱ्यांच्या मागणीच्या प्रमाणात यांत्रिकीकरणासाठी पुरेसा निधी उपलब्ध होत नाही. या बाबी विचारात घेऊन प्रत्येक वर्षी राष्ट्रीय कृषी विकास योजनामधून सुद्धा कृषी यांत्रिकीकरणासाठी निधी उपलब्ध करुन देण्यात येतो. दि. २५ जुलै, २०१८ रोजी आयोजित राष्ट्रीय कृषी विकास योजनेच्या राज्य स्तरीय मान्यता समितीच्या बैठकीत, सन २०१८-१९ या वर्षात कृषी यांत्रिकीकरणासाठी रु.१०० कोटी निधी उपलब्ध करुन देण्यास समितीने मान्यता दिली.

आयुक्त (कृषी) यांनी संदर्भाधीन दि.२० ऑगस्ट, २०१८ च्या पत्रान्वये सन २०१७-१८ या वर्षातील कृषी यांत्रिकीकरण अंतर्गत प्रलंबित अनुदानाची रक्कम अदा करण्यासाठी अतिरिक्त निधीचा प्रस्ताव शासनास सादर केला होता.

राष्ट्रीय कृषी विकास योजना- रफ्तार मधून मंजूर निधीमधून राबवावयाच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

१. सन २०१८-१९ या वर्षात उन्नत शेती- समृद्ध शेतकरी अभियानांतर्गत कृषि यांत्रिकीकरण प्रकल्प राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. तसेच, या प्रकल्पाकरिता राष्ट्रीय कृषी विकास योजना- रफ्तार योजनेंतर्गत रु.१०० कोटी निधी मंजूर करण्यात येत आहे.

२. सदर प्रकल्पाची अंमलबजावणी करताना संदर्भाधीन दि.२७ एप्रिल, २०१८ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या, "उन्नत शेती - समृद्ध शेतकरी" मोहिम राबविणेबाबतच्या मार्गदर्शक सूचना (सन २०१८-१९) मधील परिच्छेद क्र. ४.५ मधील तरतूदींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तथापि, राष्ट्रीय कृषी विकास योजना- रफ्तार योजनेतून उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या रु.१०० कोटी निधीतून केवळ कृषि यंत्र व औजारांच्या खरेदी करीता अनुदान देण्यात यावे. या निधीतून ट्रॅक्टर व पॉवर टिलर खरेदीसाठी अनुदान अनुज्ञेय असणार नाही.

३. कृषि विभागातर्फे ज्या लाभार्थ्यांना ट्रॅक्टर व पॉवर टिलरच्या खरेदीकरिता यापूर्वी रीतसर पूर्वसंमती देण्यात आली होती व सदर लाभार्थ्यांनी ट्रॅक्टर/पॉवर टिलरची खरेदी करुन देयके दि.३१ जुलै, २०१८ पूर्वी सादर केली असतील आणि निधी अभावी सदर लाभार्थ्यांना अनुदान अदा करण्यात आले नाही, अशा देयकांचे "प्रलंबित अनुदान" चालू वर्षाच्या प्रचलित योजनांच्या अनुदानातून प्राथम्याने अदा करण्यात यावे, व सदर योजनांच्या निधीतून प्रलंबित अनुदानाची रक्कम अदा करणे शिल्लक राहिल्यास ती अदा करण्याकरिता राष्ट्रीय कृषी विकास योजना रफ्तार अंतर्गत या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात येत असलेल्या कृषी यांत्रिकीकरण प्रकल्पाचा निधी विनियोगात आणावा.

४. ट्रॅक्टर व पॉवर टिलर खरेदी करुन दि. ३१ जुलै, २०१८ पूर्वी अनुदानासाठी प्रस्ताव सादर केलेल्या प्रस्तावांची तपासणी आयुक्त (कृषी) यांनी करुन प्रलंबित देयकांच्या अनुदानाची एकूण रक्कम निश्चित करावी.

५. राष्ट्रीय कृषी विकास योजना- रफ्तार मधून जसा निधी उपलब्ध करुन देण्यात येईल त्यामधून अनुदानाची रक्कम लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यावर PFMS प्रणालीद्वारे जमा करण्यात यावी.

६. राष्ट्रीय कृषी विकास योजना- रफ्तार मधून कृषी यांत्रिकीकरण प्रकल्पासाठी उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या निधीमधून क्षेत्रिय स्तरावर कार्यक्रमाच्या अंमलबजावणीची कार्यपद्धती आयुक्त (कृषी) यांनी विहीत करुन सर्व क्षेत्रिय अधिकाऱ्यांना कळवावी.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१०१५२००९०३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2018.10.10 15:26:07 +05'30'

**(श्रीकांत आंडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. संचालक ( विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,पुणे
३. संचालक ( निविष्ठा व गुण नियंत्रण), कृषि आयुक्तालय,पुणे
४. सर्व सन्माननीय विधीमंडळ सदस्य द्वारा विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. सर्व संचालक / सहसंचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
६. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
७. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
८. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर (लेखा परिक्षा) /(लेखा व अनुज्ञेयता)
९. महालेखाकार (स्थानिय) निकाय लेखापरिक्षा व लेखा प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०००२०
१०.माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
११.नियोजन विभाग (का-१४३१) /मंत्रालय, मुंबई-३२
१२. वित्त विभाग ( व्यय-१ व अर्थसंकल्प - १३ ) / मंत्रालय, मुंबई-३२
१३.मा. राज्यमंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव
१४.मा. मंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव
१५. निवड नस्ती (कार्यासन -१४अे)